भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील मुख्य खोदण अभियंता (गट-अ) या संवर्गातील अधिकाऱ्यांची तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची
(दि.०१ जाने, २०१६ ते दि.०१ जाने, २०१८)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः आपना-२०१६/प्र.क्र.१३९/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख:०६ सप्टेंबर, २०१८.

**वाचा :**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/१२, दिनांक २१ ऑक्टोबर, २०११

२) **शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१६/प्र.क्र.१३९/पापु-१५, दिनांक १७ जानेवारी, २०१७.

**शासन परिपत्रक :**

सामान्य प्रशासन विभागाने शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांची प्रत्येक वर्षी ज्येष्ठता सूची तयार करणे व प्रसिध्द करणे यासाठी संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये सर्वंकष धोरण जाहीर केले आहे. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील मुख्य खोदण अभियंता (गट-अ) संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१२ ते दिनांक ०१/०१/२०१५ ची तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार मुख्य खोदण अभियंता (गट-अ) पदाच्या सन २०१५, २०१६ व २०१७ च्या निवडसूचीत समाविष्ट झालेल्या अधिकाऱ्यांची नावे अंतर्भूत करून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील मुख्य खोदण अभियंता (गट-अ) संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१६, दिनांक ०१/०१/२०१७ व दिनांक ०१/०१/२०१८ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची तयार करण्यात आली आहे. सादर ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबत जोडपत्र-अ म्हणून जोडण्यात आली आहे.

तसेच मुख्य खोदन अभियंता, गट-अ पदावरील पदोन्नतीच्या निवडसूचीतील ज्या अधिकाऱ्यांचे नियमित पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात आलेले नाहीत, अशा अधिकाऱ्यांची नावे सुद्धा परिशिष्ट-

ब मध्ये समाविष्ट करण्यात आली आहेत. त्यांच्या नियमित पदोन्नतीचे आदेश निर्गमित झाल्यानंतर त्यांचा ज्येष्ठतासूचीमध्ये योग्य त्या स्थानी समावेश करण्यात येईल.

सदर ज्येष्ठतासूची मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक २९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३, ३३७४/२०११, २७९७/२०१५ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहतील.

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक सोबतच्या ज्येष्ठतासूचीत समाविष्ट असलेल्या व आपल्या विभागात कार्यरत असलेल्या, विभागातून सेवानिवृत्त झालेल्या तसेच विभागाच्या आस्थापानेवरून प्रतीनियुकीवर असलेल्या सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे. ज्येष्ठतासूचीत काही वास्तविक चुका अथवा त्रुटी राहिल्या असतील तर त्याबाबत संबंधित अधिकाऱ्याने आपले निवेदन संचालनालयामार्फत सादर करावे. अधिकाऱ्यांच्या निवेदनातील वस्तुस्थिती संचालनालयाने त्या अधिकाऱ्यांचे सेवापुस्तक व अन्य उपलब्ध अभिलेख तपासून संचालकांच्या अभिप्रायासह शासनास दिनांक ०६ ऑक्टोबर, २०१८ पूर्वी सादर करावी म्हणजे, त्याची पडताळणी करून ज्येष्ठतासूचीत आवश्यक ते बदल करणे शक्य होईल. त्यानंतर प्राप्त झालेल्या निवेदनांवर विचार करण्यात येणार नाही.

ज्येष्ठतासूचीमधील अधिकाऱ्यांच्या नावासमोर नमूद केलेला ज्येष्ठता दिनांक हा शासन अधिसूचना सा.प्र.वि. क्रमांक एसआरव्ही-१०७६/बारा, दिनांक २१ जून, १९८२ नुसार फक्त मुख्य खोदण अभियंता संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्यासाठी विचारात घेण्यात येईल. इतर कोणत्याही आर्थिक फायद्यासाठी तो दिनांक गृहीत धरला जाणार नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक 201809061439591128 असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2018.09.06 15:19:25 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.

२. उप सचिव (कार्यासन -१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
४. मुख्य खोदण अभियंता, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
५. वरिष्ठ खोदण अभियंता, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
६. उपअभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
७. निवड नस्ती (कार्यासन पापु-१५), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

शासन परिपत्रक क्र.आपना-२०१६/प्र.क्र.१३९/पापु-१५, दिनांक: ०६ सप्टेंबर, २०१८ सोबतचे परिशिष्ट-"अ" व "ब"

# परिशिष्ट-अ

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील "मुख्य खोदण अभियंता (गट-अ)" संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१ जानेवारी, २०१६, दि.०१ जानेवारी, २०१७ व दि.०१ जानेवारी, २०१८ रोजीची तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची.

| मुख्य खोदण अभियंता संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१६ ची ज्येष्ठतासूची | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | २०१६ मधील ज्येष्ठता क्रमांक | नांव | प्रवर्ग | जन्म दिनांक | मुख्य खोदण अभियंता पदावर नियुक्तीचा दिनांक | मुख्य खोदण अभियंता पदावर नियुक्तीचा मार्ग | मुख्य खोदण अभियंता पदावर ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | १ | निरंक | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |

| मुख्य खोदण अभियंता संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१७ ची ज्येष्ठतासूची | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | २०१७ मधील ज्येष्ठता क्रमांक | नांव | प्रवर्ग | जन्म दिनांक | मुख्य खोदण अभियंता पदावर नियुक्तीचा दिनांक | मुख्य खोदण अभियंता पदावर नियुक्तीचा मार्ग | मुख्य खोदण अभियंता पदावर ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | १ | निरंक | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |

| मुख्य खोदण अभियंता संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१८ ची ज्येष्ठतासूची | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | २०१८ मधील ज्येष्ठता क्रमांक | नांव | प्रवर्ग | जन्म दिनांक | मुख्य खोदण अभियंता पदावर नियुक्तीचा दिनांक | मुख्य खोदण अभियंता पदावर नियुक्तीचा मार्ग | मुख्य खोदण अभियंता पदावर ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | १ | निरंक | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |

| परिशिष्ट-ब | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| दिनांक ०१/०१/२०१६, दि.०१/०१/२०१७ व दि.०१/०१/२०१८ रोजी मुख्य खोदण अभियंता संवर्गात तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले अधिकारी | | | | | | | | |
| अ.क्र. | श्री/ श्रीमती | नांव | प्रवर्ग | जन्म दिनांक | मुख्य खोदण अभियंता पदावर तदर्थ पदोन्नतीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | श्री. | श्री.एस.एम. वानखेडे | अ.जा. | ०२ जुलै, १९६१ | २७ सप्टेंबर, २०१३ | ३१ जुलै, २०१९ | बी.इ. (मेक) | -- |